**सन १९७५ ते १९७७ मधील आणिबाणीच्या कालावधीत लोकशाहीकरिता लढा देणा-या ज्या व्यक्तींना बंदिवास सोसावा लागला अशा व्यक्तींचा सन्मान/यथोचित गौरव करण्यासंबंधीच्या धोरणात सुधारणा**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बीयुडी-१४२२/प्र.क्र.१९७/स्वासैक-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक २५ मे, २०२३

**वाचा:-**

१) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्र.निवृवे-१०१५/प्र.क्र.२६१/२०१५(२०१८)/ स्वासैक-१,दिनांक ३ जुलै, २०१८.
२) सामान्य प्रशासन विभाग,शासन पूरक पत्र क्र.निवृवे-१०१५/प्र.क्र.२६१/२०१५(२०१८)/स्वासैक-१,दिनांक १५ सप्टेंबर,२०१८.
३) सामान्य प्रशासन विभाग,शासन शुद्धीपत्रक क्रनिवृवे-१०१५/प्र.क्र.२६१/२०१५(२०१८)/स्वासैक-१,दिनांक१५ नोव्हेंबर,२०१८
४) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्र.संकीर्ण-१९१८/प्र.क्र.४०/२०१८/स्वासैक-१,दिनांक२६फेब्रुवारी, २०१९.
५) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्र.निवृवे-१०१५/प्र.क्र.२६१/२०१५(२०१८)/स्वासैक-१,दिनांक ३१ जुलै,२०२०.
६) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्र.संकीर्ण-१९१८/प्र.क्र.४०/स्वासैक-१,दिनांक २८ जुलै, २०२२.

**प्रस्तावना:-**

भारतामध्ये दिनांक २५.०६.१९७५ ते दिनांक २१.०३.१९७७ या कालावधीत घोषित करण्यात आलेल्या आणीबाणीच्या कालावधीत ज्या व्यक्तींना बंदिवास/कारावास भोगावा लागला, अशा व्यक्तींचा सन्मान/यथोचित गौरव करणेबाबत दिनांक ०३.०७.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये धोरण निश्चित केले. कोविड विषाणुच्या प्रादुर्भावामुळे निर्माण झालेल्या परिस्थितीमुळे महसुली तूट विचारात घेऊन दिनांक ३१ जुलै, २०२०रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर योजनेची अंमलबजावणी बंद करण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यानंतर राज्यात नवीन मंत्रिमंडळ अस्तित्वात आल्यानंतर मा.मंत्रिमंडळ बैठकीत झालेल्या निर्णयानुसार दिनांक २८.०७.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर योजना दिनांक १ ऑगस्ट, २०२२ पासून पुन्हा सुरु केली.

दिनांक ३ जुलै, २०१८ ते दिनांक ३१ जुलै, २०२० पर्यंत (योजनेची अंमलबजावणी बंद करेपर्यंत) ज्या पात्र व्यक्तींचे अर्ज प्रलंबित राहिले अशा अर्जदारांना कोणत्या दिनांकापासून मानधन मंजूर करावे ही बाब शासनाच्या विचाराधीन होती. तसेच जिल्हाधिकारी यांनी उपस्थित केलेल्या मुद्यांच्या अनुषंगाने प्रचलित धोरणात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन १९७५ ते १९७७ मधील आणिबाणी कालावधीत लोकशाहीकरिता लढा देताना मिसा व डीआयआर अंतर्गत सामाजिक व राजनैतिक कारणासाठी ज्या व्यक्तींना बंदिवास/कारावास सोसावा लागला अशा व्यक्तींचा सन्मान/यथोचित गौरव करण्यासाठी मानधन मंजूर करण्याच्या धोरणात खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे. याव्यतिरिक्त संदर्भाधीन शासन निर्णयातील अन्य अटी व शर्ती तशाच लागू राहतील.

१) आणिबाणी कालावधीत लोकशाहीकरिता लढा देताना मिसा व डीआयआर अंतर्गत सामाजिक व राजनैतिक कारणासाठी ज्या व्यक्तींनी बंदिवास/कारावास भोगला, केवळ अशा व्यक्ती मानधनासाठी पात्र असतील.

२) आणीबाणी कालावधीमध्ये मीसा आणि डीआयआर अंतर्गत सामाजिक व राजनैतिक कारणांसाठी दोन वेळा शिक्षा झाली असल्यास, अशा अर्जदारांना एकदाच मानधन अनुज्ञेय राहील.

३) दिनांक २८ जुलै, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये नव्याने अर्ज सादर करण्याचा अंतिम दिनांक ३१.१०.२०२२ असा निश्चित केला आहे. कोणत्याही परिस्थितीत सदर दिनांकानंतर प्राप्त झालेले अर्ज विचारात घेऊ नये.

४) सदर योजनेंतर्गत मानधनासाठी अर्ज करणाऱ्या अर्जदाराचे वय अटकेच्या वेळी किमान १८ वर्षे असणे आवश्यक राहील.

५) १८वर्षाखालील व्यक्ती सदर योजनेअंतर्गत पात्र असल्यास अशा अर्जदारांच्या बाबतीत अर्जाची छाननी करताना संबंधित जिल्हाधिकारी यांनी अटकेशी संबंधित कागदपत्रांची पडताळणी व संबंधित तुरुंग प्रशासनाकडे खातरजमा करुनच अर्ज मंजूरीबाबत निर्णय घ्यावा.

६) दिनांक ३ जुलै, २०१८ ते दिनांक ३१ जुलै, २०२० या कालावधीत (योजनेची अंमलबजावणी बंद करेपर्यंत) ज्या पात्र व्यक्तींचे अर्ज प्रलंबित राहिले अशा अर्जदारांना, त्यांच्या अर्जाच्या दिनांकापासून मानधन मंजूर करण्यात यावे.

२. अनु क्र.६ येथे नमूद पात्र अर्जदारांची यादी थकबाकीच्या परिगणनेसह संबंधित जिल्हाधिकारी यांनी शासनास सादर करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा संकेतांक क्रमांक २०२३०५२५१३२४२४०५०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

ANUSHRI ARVIND PARAB

Digitally signed by ANUSHRI ARVIND PARAB
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=9cd457c3499803413f595e2a9672abfe873725fe8cea5f909d2e30a578cdb448, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=94114817BD726F28FA97FD6789383FFB6B7167B44B2A0A517BD03DE3D9C87038, cn=ANUSHRI ARVIND PARAB
Date: 2023.05.25 13:24:53 +05'30'

**(अनुश्री परब)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा. विरोधी पक्षनेता विधान परिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई.
६. सर्व मा.संसद सदस्य.
७. सर्व मा.विधानमंडळ सदस्य, विधानभवन मुंबई,

८. सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव,
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १, मुंबई,
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र २, नागपूर,
११. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १, मुंबई,
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र २, नागपूर,
१३. सर्व विभागीय आयुक्त,
१४. सर्व जिल्हाधिकारी,
१५. सर्व पोलीस आयुक्त,
१६. सर्व पोलीस अधीक्षक,
१७. सर्व तुरुंगाधिकारी,
१८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२१. सामान्य प्रशासन विभाग, का.२५, मंत्रालय, मुंबई,
२२. क.अ. वित्त विभाग, (अर्थ संकल्प १४ / व्यय-४) मंत्रालय, मुंबई,
२३. निवड नस्ती/स्वासैक-१.